८६

2011020314513800। पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवर मुख्याध्यापकांची पदे निर्माण करणे.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्र.पीसीसी १०९०/१६०६/प्र.क्र.२२४/९०/नवि-२२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : २४ जुलै, १९९१.

वाचा :- आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांची पत्रे :-
१] क्र.माध्य/शिक्षण/१/कावि ६८३/९० दि.८.८.९०
२] क्र.माध्य/शिक्षण/१/कावि११०/९० दि.११.१२.९०
३] क्र.माध्य/शिक्षण/१/कावि ३५२/९१ दि.९.५.९१.

शासन निर्णय :- मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ५१ [४] अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून, शासन याद्वारे पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवर महानगरपालिकेने सुरू केलेल्या काळेवाडी, वाकड, खराळवाडी व पिंपरी-नगर या चार ठिकाणच्या महाविद्यालयासाठी खालील प्रमाणे चार मुख्याध्यापक पदांना मंजूरी देण्याच्या महानगरपालिकेच्या प्रस्तावास मंजूरी देत आहे.

| अ.क्र. १ | पदाचे नांव २ | पद संख्या ३ | वेतनश्रेणी ४ |
|---|---|---|---|
| १. | मुख्याध्यापक | चार | रु.६००-३०-७५०-४०-९५०- ५०० विद्यार्थ्यांपर्यंत असलेल्या शाळांकरिता<br>रु.७५०-४०-११५०- ५०० विद्यार्थ्यांपेक्षा अधिक असलेल्या शाळांकरिता. |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

र. गो. साळगांवकर
[ र. गो. साळगांवकर ]
कार्यासन अधिकारी.

प्रति,

आयुक्त,
पिंपरी-चिंचवड महानगरपालिका,
पिंपरी, पुणे.